# नाटक बसवण्यापूर्वी—

पुष्कळदां आपण पाहातों कीं, मुळांत चांगल्या असलेल्या नाटकाचा जेव्हां प्रयोग केला जातो, तेव्हां तो कंटाळवाणा होतो. विशेषतः व्यावसायिक कंपन्या करीत असलेल्या नाटकांचे प्रयोग जेव्हां ॲमेच्युअर्स संस्था करतात, तेव्हां तर हा दोष ठळकपणें दिसून येतो. खरें म्हटलें, तर एखादें साधारण नाट्यगुण असलेलें नाटकहि, दिग्दर्शनाच्या कौशल्यामुळें, रंग-भूमीवर प्रेक्षणीय वाटतें. उलट, ही दिग्दर्शनाची दृष्टि नसेल, तर चांगल्या नाटकाचीहि माती होते. यासाठीं ॲमेच्युअर्स संस्थांना मार्गदर्शन व्हावें, म्हणून कांहीं एकांकिकांची, दिग्दर्श-नाच्या सूचनांसह, पुस्तकें प्रसिद्ध करण्याची अभिनव योजना अंमलांत आणण्यांत येत आहे.

‘ नाटक बसवणें ’ म्हणजे काय, याची खरोखरच कांहीं जुन्या नटश्रेष्ठांना देखील नीटशी जाणीव असलेली दिसत नाहीं. ‘ नाटक बसवणें ’ म्हणजे नक्कल तोंडपाठ करणें, शब्दोच्चार स्पष्ट करणें आणि ‘ पिट ’ पर्यंत ऐकूं जाईल एवढ्या मोठ्यानें बोलणें, यापेक्षां त्यांना जाणीव असलेली दिसत नाहीं. फार फार तर शब्दांतील आशयाप्रमाणें हातवारे केले म्हणजें झालें. या बाबतींत जुन्या तालीम मास्तरांच्या अनेक नवलकथा मी ऐकलेल्या आहेत. अर्थातच, जुन्या नाटकांत पात्रें संवादापेक्षां संभाषणच जास्त बोलत असल्यामुळें, हीं संभाषणें चोख पाठ करून घेणें, हेंच तालीममास्तराचें मुख्य काम असे. नाटककारानें जें लिहिलें

आहे तें प्रेक्षकांपर्यंत पोंचवणें, एवढेंच नटाचें काम. अर्थातच, पूर्वींच्या नाटकांचा भर त्यांतील संगीतावर असल्यामुळें पात्रें काय बडबडतात, इकडे प्रेक्षक सहसा मनापासून लक्ष देत नसत. त्यांच्या अभिनयाकडेहि त्यांचें लक्ष नसे. लक्ष असे तें अमूक एक नट अमुक गाणें कसें म्हणतो याकडे. यामुळें पूर्वीं होऊन गेलेल्या अनेक गायक नटांनीं संगीताच्या जोरावरच आपलें नांव केलें हें दिसून येईल. महाराष्ट्र नाटक मंडळीसारख्या गद्य कंपन्यांत मात्र संगीताची उणीव भरून काढण्यासाठीं अभिनयादि इतर गोष्टींकडे जास्त लक्ष द्यावें लागे. पण त्यावेळचीं नाटकें पाहिलेल्या प्रेक्षकांना, त्यावेळचे गद्य नट आवाज ' लावण्या 'ची कसरतच जास्त करीत असत हें आठवत असेल. त्यामुळें ' नाटक बसवणें ' या बाबतींतील या गद्य नाट्यसंस्थांची व्याख्याही परिपूर्ण नव्हती.

जेव्हां सामाजिक नाटकांचा जमाना सुरू झाला—विशेषतः विदेशी नाटकांची छाप आपल्या नाटककारांच्या नाटकांवर—आणि त्यांतही, संवादपद्धतीवर पडूं लागली, तेव्हांच ' नाटक बसवण्या 'च्या आणखी कांहीं क्लृप्त्या आहेत, हें उपलब्ध झालें; व पूर्वीं रंगभूमीवर आलेलीं पात्रें खिळे ठोकलेल्या येशु ख्रिस्ताप्रमाणें एकाच जागीं खिळून उभीं राहात, तीं आतां ह्या नवीन पद्धतीच्या नाटकांतून रंगभूमीवर मोकळेपणानें वावरूं लागलीं. त्यामुळें रंगभूमीवर जास्त जिवंतपणा आला. नाटककरानें जें प्रत्यक्ष लिहिलेलें नाहीं, तें रंगभूमीवर दिसून येऊन प्रयोगांत जास्त जिवंतपणा दिसूं लागला, त्यांत सजीवता आली. पात्रांची ऊठ बस, दोन पात्रें बोलतांना त्यांच्या संवादांतील आशयाप्रमाणें त्यांची होणारी हालचाल, इतर पात्रें तेथें असल्यास त्यांच्यावर होणारे परिणाम हें सर्व पाहातांना प्रेक्षकांना त्या पात्रांबद्दल आत्मीयता वाटूं लागली. पूर्वीं पात्रें बोलतांना क्वचितच एकमेकांकडे पाहात.

प्रेक्षकांसमोर तोंड करून जणूं काय त्यांनाच उद्देशून तीं बोलत. अलिकडच्या नाटकांत जास्त स्वाभाविकता आली. ह्या स्वाभाविकतेचा तुच्छतापूर्वक उल्लेख करणारीं श्री. गोविंदराव टेंबे यांच्यासारखीं कांहीं जुनीं खोडें आजही दिसून येतात. परंतु, श्री. टेंबे यांचीं मतें किती बुरसलेलीं आहेत, हें त्यांच्याशीं नाट्याबद्दल दहा मिनिटें बातचीत केली, तर सहज दिसून येतें. नाटक हें कृत्रिमच असलें पाहिजे, हीच या जुनाट लोकांची कल्पना. त्यामुळें, आजकालच्या सामाजिक नाटकांत येणाऱ्या सामाजिक समस्याही त्यांना नाट्याला पोषक वाटत नाहींत. परंतु, आतां जो हा नवीन नाट्यप्रकार रंगभूमीवर निर्माण झाला आहे, त्यांत पिछेहाट होण्याचा सुतराम् संभव नाहीं. नाटक हें रंगभूमीवरील केवळ करमणुकीचें साधन नसून त्याचा जीवनाशीं आतां घनिष्ट संबंध जडला आहे. नाटकांतून जीवन प्रकट करण्याचा आधुनिक नाटककारांचा उद्देश सफल होत चालला आहे. अशा वेळींच हीं नाटकें लोकांसमोर जास्त स्वाभाविक स्वरूपांत ठेवणें, ही नाट्य-दिग्दर्शकावरील जबाबदारी वाढली आहे. मूळ नाटकांतील जिवंतपणा तितक्याच-किंबहुना कंकणभर जास्त-जिवंत स्वरूपांत प्रेक्षकांसमोर मांडण्याची त्याच्यांत कुवत पाहिजे. ही कुवत अंगीं येण्यासाठीं नित्य नवीं नवीं नाटकें बसवण्याचे त्यानें प्रयत्न केले पाहिजेत-चांगलीं बसवलेलीं इतरांचीं नाटकें लक्षपूर्वक पाहिलीं पाहिजेत. नाटककार नाटकांत प्रत्येक बारीक सारीक गोष्ट लिहीत नसतो. ती दिग्दर्शकानें कौशल्यानें टिपून घेतली पाहिजे. त्याचा आशय आपल्या दिग्दर्शन कौशल्यानें प्रेक्षकांना दाखवला पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे नाटककारानें आपला जीव ओतून तयार केलेल्या बाहुलीला सुंदर वस्त्रालंकारांनीं नटवून प्रेक्षकांपुढें तिला ठेवली पाहिजे.

या बाबतींत ‘ नाट्यनिकेतन ’ च्या नाट्यप्रयोगांची नेहमींच

प्रशंसा होते. हीं नाटकें कशीं बसवलीं जातात, हें पाहाण्याची अनेक प्रेक्षकांना उत्कंठा असते. ती जरी पूर्ण करतां आली नाहीं, तरी त्यांना या एकांकिकेच्या शेवटीं दिलेल्या ठोकळ सूचनांवरून त्याची थोडीफार कल्पना येईल. विशेषतः, नाटकें बसवूं पाहाणाऱ्या ॲमेच्युअर नाट्यसंस्थांना त्यामुळें थोडेंफार मार्गदर्शन होईल. नोटेशनचीं पुस्तकें वाचून जसें गातां येणार नाहीं, तसेंच ह्या दिग्दर्शनाच्या सूचना वाचून नाटक बसवतां येईल असेंही नाहीं. परंतु, ज्याला थोडीफार नाट्यदृष्टि आहे, त्याला मात्र त्यांतून कांहीं कल्पनांचा पुरवठा होईल. नाटक कसें बसवावें, याची साधारण तरी कल्पना यावी, म्हणून प्रथम कांहीं एकांकिकाच दिग्दर्शनाच्या सूचनांसह प्रसिद्ध करण्यांत येणार आहेत. व हा प्रयत्न यशस्वी झाल्यास नंतर मोठीं संपूर्ण नाटकें प्रसिद्ध करण्याचा मानस आहे. या परिश्रमांचा कांहीं उपयोग झाला, तर लेखकाला श्रमपरिहाराचें समाधान लाभेल.

मॉडेल हाऊस
प्रॉक्टर रोड,
मुंबई नं. ४

**मो. ग. रांगणेकर**

# प्रयोगाची पूर्व तयारी

" सतरा वर्षे " ही एकांकिका करण्यास तीस ते पसतीस मिनिटें लागतील. या एकांकिकेंत एकूण सहा पात्रें आहेत. त्यांचें स्वरूप व वेषभूषा पुढीलप्रमाणें:—

**पद्मा :** पंधरा–सोळा वर्षांची, मॅट्रिकच्या वर्गांत असलेली मुलगी. गोड चेहरा. वेषभूषा शाळेंत जाणाऱ्या सर्वसाधारण मुलीसारखी. वेणीचा शेपटा.

**इंदिराबाई :** पसतिशी ओलांडलेली. वृत्तीनें गंभीर. थोडीशी स्थूल असल्यास चालेल. नऊवारी लुगडें व सुती कापडाचा ब्लाउज. केसांचा आंबाडा. चालणें, बोलणें पोक्त.

**श्याम :** चाळिशीजवळ आलेला. नजर बदमाषाची पण वाणी मोह पाडणारी. मळका शर्ट, फाटका कोट व मळकें धोतर नेसलेला. पायांत कांहीं नाहीं. दाढी आठ दिवसांची वाढलेली. केस विस्कटलेले. त्यावर घातलेली टोपीही जुनी. एकेकाळीं देखणा असलेला, पण आतां परिस्थितीनें गांजलेला.

**शंकरराव :** मध्यम बांध्याचा, चाळिशीजवळ आलेला, हंसत-मुख, बारीक मिशी, धोतराचा काचा मारलेला, शॉर्ट कोट–टोपी, पायांत स्लीपर. केसांचा डाव्या बाजूला भांग पाडलेला.

**गणपतराव :** पन्नाशी ओलांडलेले, भरपूर मिशी असलेले पोक्त गृहस्थ. लॉंग कोट, धोतर, पगडी, पायांत बूट-स्टॉकिंग. मुद्रा हेडक्लार्कला शोभणारी.

**यशोदाबाई :** चाळीशी ओलांडलेली पोक्त स्त्री. लुगडें, खणाचा ब्लाउज. कानांत हिऱ्याचीं कुडीं, हातांत गोट-पाटल्या. सुखवस्तु दिसणारी. थोडीफार स्थूल.

## दिवाणखान्याची रचना

मध्यमस्थितींतील प्रापंचिकाचें घर. स्टेजच्या मध्यभागीं दोन आरामखुर्च्या व मध्यें टीपॉय. त्याच्यावर एक टेबलक्लॉथ. त्या आरामखुर्च्यांच्या मागें भिंतीला टेंकून ठेवलेल्या दोन साध्या खुर्च्या. तेथेंच भिंतीला कपडे लावण्यासाठीं खुंटाळें. समोर डाव्या व उजव्या टोंकाला दोन दरवाजे. डावा दरवाजा स्वयंपाक खोलीचा, उजवा बाहेरून येण्याचा.

उजव्या हाताला खिडकी, त्याच्या अलिकडे भिंतीला लावलेला आरसा व आरशाखालीं फळीवर फणी, ब्रश, पॉवडर, ब्रिलियंटाइन वगैरे सामान. खिडकीखालीं एक कोच अगर बैठक.

डाव्या बाजूस शंकररावांच्या खोलीचा दरवाजा. तिन्ही दरवाजांना शक्य तर मण्यांचीं तोरणें लावलेलीं. डाव्या भिंतीला दरवाजाजवळ टेबल–खुर्ची. टेबलावर पुस्तकें, वर्तमानपत्रें, ब्लॉटर, वगैरे. भिंतीवर सरस्वती व दत्तात्रय यांच्या तसबिरी. एक-दोन फॅमिली–ग्रुपचे जुने फोटो, कॅलेंडरें वगैरे.

## प्रयोगासाठीं लागणाऱ्या किरकोळ वस्तु

शाळेंतलीं पुस्तकें–चोपड्या, आरसा, फणी, ब्रश, पॉवडरचा डबा, ब्रिलियंटाइन, नॅपकिन, विणलेले दोन टेबलक्लॉथ, तीन कपबशा, ट्रे, शंकरराव ऑफिसांत नेत असलेला लहान डबा व पिशवी, तपकिरीची डबी.



[ दिग्दर्शनाच्या सूचना शेवटीं दिल्या आहेत. ]

# सतरा वर्षें

[ पद्मा शाळेंतून येते. तिच्या हातांत पुस्तकें आहेत. तिचे केस विसकटलेले आहेत. कसल्यातरी भावी आनंदानें ती गुणगुणत आहे. पुस्तकें टेबलावर टाकून ती आंत तोंड धुवून पुन्हां बाहेर येते, केस विंचरते, पॉवडर लावते, त्या वेळींही हा आनंद वाढत आहे, असें ती प्रसन्नतेनें गुणगुणत ह्या सर्व गोष्टी करीत आहे, त्यावरून प्रत्ययास येतें. प्रत्यक्ष तिची आई — इंदिराबाई माजघराच्या दरवाज्यांत उभ्या राहून तिच्या ह्या सर्व हालचाली पाहात आहेत, त्यांच्याही तें लक्षांत येतें. पद्मा शेवटचें एकदां आरशांत पाहून जावयास निघते. ]

**इंदिराबाई :** पद्मा —

**पद्मा :** ( दचकून मागें पाहात ) काय आई ?

**इंदिराबाई :** कुठं चाललीस ?

**पद्मा :** ( घुटमळून ) जातें आहे — अं — सुशीलाकडे.

**इंदिराबाई :** कुणाकडे म्हणालीस ?

**पद्मा :** नाहीं ग — अशीच त्या हिच्याकडे — माझ्या वर्गांत ती कुसुम आहे ना ?

**इंदिराबाई :** ( मध्येंच ) अस्सं. सुशीलाची इतक्यांत कुसुम झाली ?

**पद्मा :** नाहीं ग आई —

**इंदिराबाई :** पद्मा, कुणाशीं खोटं बोलते आहेस तूं? तुझ्या आईशीं? रोज तूं कांहीं ना कांहीं सांगून अशीच बाहेर जातेस. शाळेंतून आलीस तर कॉफी घ्यायला देखील थांबत नाहींस. कुणाला भेटायची घाई लागलेली असते तुला रोज रोज?

**पद्मा :** छेः ग —

**इंदिराबाई :** पद्मा, मींही एकेकाळीं तुझ्याएवढी होतें. अशीच तुझ्यासारखी आईला कांहीं तरी खोटं सांगून मी जात असें. कुठें सांगूं?— जाऊं दे, ती आठवणही नको. तशी तूंही मला फसवते आहेस. पद्मा, आईपासून कांहींही चोरून ठेऊं नये. जा.

**पद्मा :** ( हळुच तिच्यामागें जाऊन उभी राहात ) आई —

**इंदिराबाई :** ( मागें वळूनहि न पहातां ) काय बाळ?

**पद्मा :** रागावलीस?

**इंदिराबाई :** छेः.

**पद्मा :** खरं सांगूं तुला?... पण तूं...

**इंदिराबाई :** खरं बोलणाऱ्यावर कधीं कुणी रागावतं का?

**पद्मा :** पण आप्पांना सांगणार नाहींस?

**इंदिराबाई :** त्यांना सांगण्यासारखं नसलं तर नाहीं सांगणार.

**पद्मा :** किनई मी...माझं...कसं सांगूं तुला!

**इंदिराबाई :** आतां सांगितलंस तसंच. कांहीं सांगायला नको. सारं कांहीं कळलं मला...काय करतो तो?

**पद्मा :** कॉलेजांत जातो.

**इंदिराबाई :** आणि कुठं भेटतां तुम्हीं?

**पद्मा :** हें काय ग आई?

**इंदिराबाई :** चांगला आहे ना तो?

**पद्मा :** तर.

**इंदिराबाई :** वाटायचाच तुला. तुम्हां चिमुरड्या पोरींना मनांत भरलेला मुलगा अगदीं छत्तीस गुणी वाटायचा !

**पद्मा :** बरं बरं... तूं पाहाशील तेव्हां तूंही असंच म्हणशील.

**इंदिराबाई :** मग घेऊन ये ना त्याला.

**पद्मा :** अय्या, इथं ?

**इंदिराबाई :** मला पाहायला नको का त्याला? घाबरतो कीं काय तो इथं यायला ?

**पद्मा :** इश्श, घाबरणार कशाला? पण खरंच का ग आणूं त्याला ?

**इंदिराबाई :** हो. आतां भेटेल ना तो? घेऊनच ये त्याला इकडे आज.

**पद्मा :** आज ? पण आप्पा येतील ना ऑफिसांतून ?

**इंदिराबाई :** मग त्यांना न दाखवितां लग्न करणार आहेस होय त्याच्याशीं ? वेडी कुठली.

**पद्मा :** बरं, पाहते हं येतो का तो.

**इंदिराबाई :** येच घेऊन. इतकंहि ऐकत नाहीं का तो तुझं ? आणि म्हणे......

**पद्मा :** ( मध्येंच खोट्या रागानें ) आई......

**इंदिराबाई :** बरं जा, जा.

[ पद्मा जाते. इंदिराबाई ती जातांना थोडा वेळ तिला पाहात राहाते. व मग वळून तिचीं पुस्तकें वगैरें नीटनेटकीं ठेवते. ती आंत जाऊं लागते. श्याम येतो. त्याची दाढी वाढली आहे. कोटाला गुंड्या नाहींत, धोतराचा सोगा खिशांत ठेवलेला. हातांतलें विडीचें थोटुक टाकतो व तो खांकरतो. ]

**इंदिराबाई :** ( जातां जातां मागें वळून पाहात ) श्याम ?

**श्याम :** ( विडी पेटवीत ) हुं.

**इंदिराबाई :** कां आलास ?

**श्याम :** तुला माहीतच आहे...

**इंदिराबाई :** कितीदां सांगितलं तुला, कीं पुन्हां मला तोंड दाखवूं नको म्हणून.

**श्याम :** तुझं कर्तव्य तूं केलंस, माझं मला करायला पाहिजे.

**इंदिराबाई :** आला नाहींस तर—

**श्याम :** ( मध्येंच ) नाहीं चालायचं. तुझं नव्हे, माझं. इंदू, जरूर पडते म्हणूनच मी येतों. आज चार दिवस माझ्या खिशांत दिडकी नाहीं.

**इंदिराबाई :** वीष खाऊन जीव कां देत नाहींस ?

**श्याम :** त्याला देखील पैसा लागतोच.

**इंदिराबाई :** चालायला लाग इथून. एक पै मिळायची नाहीं यापुढं.

**श्याम :** ( कांहींच परिणाम होऊं न देतां ) असं तूं आतांपर्यंत कितीदां तरी म्हटलं आहेस.

**इंदिराबाई :** पण यावेळीं तुला निक्षून सांगतें, यापुढें मी एक पै देखील देणार नाहीं तुला. माझं काय वाटेल तें होऊं दे.

**श्याम :** हें देखील तूं पुष्कळदां म्हणाली आहेस. आतांपर्यंत मला कां पैसे देत आलीस तें आठव.

**इंदिराबाई :** श्याम, वाघ म्हटलं तरी खातो, वाघोबा म्हटलं तरी खातो. तुझा ससेमिरा जन्मभर माझ्या मागें लागण्यापेक्षां एकदांच काय तो सोक्षमोक्ष झालेला पत्करला.

**श्याम :** हा मोक्षाचा मार्ग मोठा बिकट आहे, इंदू. मोक्षाच्या गोष्टी बोलायला भारी सोप्या असतात. उगीच असा आततायीपणा करूं नकोस. यापुढें मी बिलकुल येणार नाहीं. यावेळीं फक्त पंचवीस रुपये दे मला.

**इंदिराबाई :** ( तुच्छतेनें हंसून ) पंचवीस रुपये ? एक फुटकी कवडी मिळायची नाहीं तुला.

**श्याम :** इंदू, अजून नीट विचार कर. शंकररावांना मी तुझी सारी हकीकत सांगितली तर—

**इंदिराबाई :** तर काय होईल ? मी त्यांना नको असेन, तर ते मला घरांतून हांकून लावतील, एवढंच ना ? पण माझ्या मागचा तुझा ससेमिरा तरी कायमचा बंद होईल. तयार आहे मी त्याला.

**श्याम :** तूं यावेळीं शुद्धीवर नाहींस. थोड्या वेळानें मी परत येतों. तोंपर्यंत विचार कर.

**इंदिराबाई :** तुला यायची कांहीं जरूरी नाहीं. तूं इथून काळं कर. तुझी सांवली देखील यांच्यावर आणि माझ्या पद्मावर पडायला नको.

**श्याम :** ती पडूं नये म्हणूनच मी शंकरराव नसतांना इथं येतो. आतां देखील पद्मा जाईपर्यंत मी जिन्याखालीं काळोखांत उभा होतों. म्हटलं, जोंपर्यंत तूं सरळ आहेस तोंपर्यंत आपणहि सरळ असावं. पण तूं वांकडा मार्ग पत्करलास म्हणजे मला देखील...

**इंदिराबाई :** तुझ्यासारखा नीच माणूस जगांत ब्रह्मदेवानं घडवला नसेल, श्याम. मला फशीं पाडून माझ्या अब्रूला काळं फांसलंस तें फासलंस, आणि झाल्या गोष्टीचा पश्चात्ताप न होतां पुन्हां वर मलाच धमक्या देऊन माझ्यापासून पैसे उपटायला पाहतोस ? कोणत्या घडीला ब्रह्मदेवानं तुझीमाझी गांठ घालून दिली !

**श्याम :** ( थंडपणानें ) आतां कशाला त्या जुन्या गोष्टींचा विचार करायचा ? आपली गांठ पडली, सारं कांहीं जमलं, आपला मुलगा—

**इंदिराबाई :** ( मध्यें ओरडून ) चूप राहा. ' आपला ' हा शब्द देखील तोंडांतून काढूं नकोस.

**श्याम :** काढला नाहीं म्हणून तें खोटं थोडंच होणार आहे!

**इंदिराबाई :** हलकट, नीच...

**श्याम :** हव्या तेवढ्या शिव्या दे. त्यामुळें झालेली गोष्ट ब्रह्मदेवालाही निस्तरतां येणार नाहीं.

**इंदिराबाई :** तुझ्या रक्तांतला एक थेंब देखील त्याच्या रक्तांत नाहीं, समजलास? आपला मुलगा म्हणे! तुझ्या रक्तापासून तो झाला आहे याची जाणीव तुझ्या अंतःकरणाला असती, तर मला फशीं पाडून तोंड काळं करून निघून गेला नसतास. आणि आज इतकीं वर्षं ही गोष्ट बाहेर फोडायची धमकी देऊन माझ्यापासून पैसे उकळण्याचा नीचपणाही केला नसतास. तुला थोडीसुद्धां माणुसकी नाहीं... तूं पशू आहेस... राक्षस आहेस.

**श्याम :** (कमालीच्या थंडपणानें) मी आहे हा असा आहे. तुझ्या आईला, भाऊंना—सगळ्यांना ही गोष्ट माहीत आहे. आणि ती लपवून शंकररावांशीं त्यांनीं तुझं लग्न लावून दिलं. आतां फक्त शंकररावांना हें कळलं म्हणजे बस्स.

**इंदिराबाई :** कळव, अवश्य कळव. पाहूं तुला काय मिळतं तें.

**श्याम :** समज, मला कांहीं मिळालं नाहीं. पण तुझी काय वाट?

**इंदिराबाई :** सांगितलं ना तुला एकदां—मी त्यांना नको असेन तर ते मला घरांतून हांकून लावतील.

**श्याम :** आणि पद्मा?

**इंदिराबाई :** तिचं काय होणार?

**श्याम :** काय होणार? (विकटपणें हंसून) काय होणार, याचा विचार केला नाहींस, म्हणूनच इतकी बेफिकिरीनं बोलते आहेस मघांपासून. विचार कर इंदू, तुझा लग्नापूर्वीचा इतिहास जगाला कळल्यावर तुझ्या पद्माशीं लग्न करायला कुणी तयार होईल? जिची आई अशी तिची मुलगी तरी काय निपजणार? खाण तशी माती. कोण तयार होणार तिच्याशीं लग्न करायला?

**इंदिराबाई :** तिचं ती पाहून घेईल. तिनं आपला नवरा स्वतः निवडला आहे, समजलास ?

**श्याम :** तुझा इतिहास माहीत नाहीं तोंपर्यंत !—ठीक, तिनं आपला नवरा निवडला आहे, नाहीं का ? कुठं राहातो तो ? त्याचा पत्ता काढलाच पाहिजे मला.

**इंदिराबाई :** ( टेबलावरचें एक पुस्तक त्याच्या अंगावर भिरकावून ) चांडाळा, माझ्या अब्रूचे धिंडवडे केलेस, आणि आतां तिचाही सत्यानाश करायला निघालास ?

**श्याम :** मी करीत नाहीं...तूं करायला लावते आहेस. जातों मी. पुन्हां अर्ध्या पाऊण तासानं येतो. तोंपर्यंत नीट विचार कर.

**इंदिराबाई :** थांब...श्याम...थांब...( तो जातो. ती हुंदके देत एका कोचावर पडते. )

**शंकरराव :** ( लांबून हांका मारीत ) पद्मा......ए पोरी— पद्मा......

[ इंदिराबाई घाईघाईनें उठून डोळे पुसतात व पद्माचीं पुस्तकें टेबलावर नीटनेटकीं ठेवण्याचा आविर्भाव करतात. ]

**शंकरराव :** ( येत ) पद्मा...कुठं गेली पोरगी ?

**इंदिराबाई :** नुकतीच बाहेर गेली.

**शंकरराव :** अस्सं ?

[ कपडे काढून इकडे तिकडे फिरतात. शीळ वाजवतात. फिरतां फिरतां व्यवस्थित असलेल्या खुर्च्या, टी पॉय वगैरे ठाकठीक करतात. टेबल-क्लॉथ झाडून पुन्हां नीट ठेवतात व स्वतःशींच चुटक्या वाजवतात. मध्येंच इंदिराबाईकडे लक्ष जाऊन हंसतात. ]

**इंदिराबाई** : कसला झाला आहे एवढा आनंद ?

**शंकरराव** : कसला झाला असेल, असं वाटतं तुला ?

**इंदिराबाई** : साहेब बोलला असेल—

**शंकरराव** : डॅम फूल ? हंः—साहेबानं 'डॅमफूल' म्हटलं म्हणून आनंद मानण्याचे दिवस गेले बरं का आतां.

**इंदिराबाई** : मग काय पगार वाढला ?

**शंकरराव** : त्यांत पद्माला काय सांगायचं ? तें मी तुला सांगितलं असतं.

**इंदिराबाई** : अस्सं अस्सं, म्हणजे फक्त पद्माला सांगण्यासारखी गोष्ट आहे म्हणायची. ठीक आहे, ती आली म्हणजे सांगावी तिला.

**शंकरराव** : वाः वाः ; आणि तुला सांगायची नाहीं वाटतं ? अग, आपल्या पद्माचं लग्न ठरलं.

**इंदिराबाई** : ( आश्चर्यानें ) लग्न ? केव्हां ?

**शंकरराव** : ( हंसत ) हें—आतांच.

**इंदिराबाई** : म्हणजे—मी नाहीं समजलें.

**शंकरराव** : समजायचं काय त्यांत ? अग, आपल्याकडे चालत आला नवरा. आहेस कुठं तूं ?

**इंदिराबाई** : आहे इथेंच-म्हणून तर विचारतें आहे, कुठला मुलगा म्हणून.

**शंकरराव** : कळेलच तुला. आतांच थोड्या वेळानं मंडळी येणार आहेत मुलगी पाहायला. भारी चांगलं स्थळ आहे. नशिबानं मिळालं पोरीच्या. ( खुर्च्या फिरवून निराळ्या तऱ्हेनें ठेवतात. )

**इंदिराबाई** : तुम्ही शब्द दिला कीं काय ?

**शंकरराव** : हो लगेच.

**इंदिराबाई** : पद्माला न विचारतां !

**शंकरराव** : तिला? ( हंसून ) त्या चिमुरडीला काय विचारायचं त्यांत ?

**इंदिराबाई** : वा : – लहान का आतां ती ?

**शंकरराव** : आणि आम्हीं लहान आहों वाटतं ? आम्हीं तिला भलत्याच घरीं देणार जसे कांहीं.

**इंदिराबाई** : छे : छे : – तसं नाहीं म्हणत मी. पण तिलाही विचारलं असतं म्हणजे बरं झालं असतं.

**शंकरराव** : आतां सांगू तुला ? हें स्थळ तिला मनापासून आवडल्यावांचून राहायचं नाहीं.

**इंदिराबाई** : म्हणजे कुणा श्रीमंताचं आहे वाटतं ?

**शंकरराव** : हो.

**इंदिराबाई** : मुलगा–

**शंकरराव** : उत्तम.

**इंदिराबाई** : आणि सासुसासरे ?

**शंकरराव** : अगदीं सोन्यासारखीं. म्हटलं ना तुला, अगदीं भाग्याची पोर आहे म्हणून. असं स्थळ शोधून देखील सांपडलं नसतं.

**इंदिराबाई** : सर्व दृष्टींनीं चांगलं स्थळ मिळायचं म्हणजे नवलच ! कांहींच कमतरता नाहीं म्हणतां ?

**शंकरराव** : अग, नाहीं–नाहीं–नाहीं. खरंच, तुम्हां बायकांचं मन किति विचित्र असतं ! अगदी सोन्यासारखं स्थळ मिळालं तरी त्यांत कुठें कांहीं कमी असेल तें शोधायला बघतां तुम्ही !–

**इंदिराबाई** : कांहीं म्हणा तुम्हीं – मला आपलं वाटतं तसं.

**शंकरराव** : ह्या शंकाकुशंका तूं आपल्या डोक्यांतून काढून टाक आणि जरा फराळाची तयारी कर आधीं. जेव्हां तूं त्यांना पाहशील....

**इंदिराबाई** : म्हणजे माझ्या ओळखीचं स्थळ आहे ?

**शंकरराव :** त्याशिवाय का म्हणतों आहे मीं ! पद्मा तर उड्या मारील.

**इंदिराबाई :** म्हणतां तरी काय तुम्हीं ?

**शंकरराव :** आतां आधीं तयारी कर चहाची. चल चल,—जा, आतां येतील ते. मी जरा घाईघाईनें पुढं आलों.

[ इंदिराबाई विचार करीत जातात. शंकरराव शीळ वाजवीत हॉलचें स्वरूप ठाकठीक करण्याचा प्रयत्न करतात. थोड्या वेळानें गणपतराव व यशोदाबाई येतात. गणपतरावांच्या डोक्यावर रुमाल, अंगांत लॉंग कोट व विजार असा एकाद्या हेडक्लार्क-सारखाच त्यांचा वेष आहे. ]

**शंकरराव :** (त्यांना पाहून) या या—या वहिनी.

**गणपतराव :** ही तुमची जागा का ? छान आहे. बरींच वर्षं झालीं नाहीं का तुम्हांला या जागेंत ?

**शंकरराव :** हो, पद्मा चार वर्षांची होती तेव्हां आलों आम्ही या जागेंत.

**यशोदाबाई :** पद्मा कुठं गेली ?

**शंकरराव :** ती कुठं बाहेर गेली आहे. पण येईल ती एवढ्यांत. आलोंच मी. ( जाऊं लागतात. )

**गणपतराव :** हें पहा—कांहीं फराळा—बिराळाच्या भानगडींत पडूं नका बरं का. सारं कांहीं झालं आहे आमचं.

**यशोदाबाई :** वहिनी आंत आहेत वाटतं ?

**शंकरराव :** हो, तिलाच बोलावून आणतों.

**गणपतराव :** त्यांना सांगितलं का ?

**शंकरराव :** म्हणजे तसं कांहीं विशेष सांगितलं नाहीं. तुम्हीं येणार म्हणून तर मुळींच सांगितलं नाहीं.

**यशोदाबाई :** आम्हांला पाहून चकितच व्हायच्या.
**गणपतराव :** थांबा तुम्हीं.
**यशोदाबाई :** मी मारतें हांका त्यांना. इंदिराबाई—अहो इंदिराबाई—
**इंदिराबाई :** ( आंतून ) कोण आहे ? आलें.

[ बाहेर येते. त्यांना पाहून दरवाजांत थबकते. तिघेंही मोठमोठ्यानें हंसूं लागतात. इंदिराबाई गंभीर चेहऱ्यानें पुढें येते. ]

**यशोदाबाई :** अगदीं थक्क झालां असाल नाहीं आम्हांला पाहून ?
**इंदिराबाई :** झालें खरी. कारण हे म्हणाले होते, पद्माला कुणी पाहायला येणार आहे......
**गणपतराव :** आलोंच आहों कीं आम्हीं.
**इंदिराबाई :** तुम्हीं ? ( शंकररावांकडे पहाते. )
**शंकरराव :** ( हंसत ) अग, सांगत नव्हतों का तुला मी— तुझ्या चांगल्या ओळखीची मंडळी आहेत म्हणून ?
**यशोदाबाई :** ( इंदिराबाईंना गप्प राहिलेलें पाहून ) ओळख विसरल्या वाटतं इंदिराबाई ?
**इंदिराबाई :** छेः, विसरेन कशाला ? पण...
**यशोदाबाई :** आम्हीं पद्माला पाहायला आलों म्हणून नवल का वाटलं तुम्हांला ?
**इंदिराबाई :** हो.
**गणपतराव :** कां आमच्या घरीं तुमच्या पद्माला द्यायचा विचार नाहीं वाटतं तुमचा ?
**शंकरराव :** ( मध्येंच ) छेः छेः, ...तसं कुठं म्हणते ती ?
**गणपतराव :** हो—आमचा भूपाल पसंत नसला तुम्हांला...

**यशोदाबाई** : (मध्येंच) भलतंच! त्यांना तर तो किती आवडतो. कधीं आपल्या घरीं बसायला आल्या आणि तो नसला तर तो घरीं येईपर्यंत थांबतात आणि त्याच्याशीं दोन शब्द बोलून मग जातात.

**गणपतराव** : अग, तें खरं. पण जांवई म्हणून तो पसंत आहे कीं नाहीं, हें नको का त्यांना पहायला?

**शंकरराव** : छे: छे: -- मला नाहीं वाटत, तिची कांहीं अडचण असेल. काय ग?

**गणपतराव** : अहो, त्यांचंही बरोबर आहे. तुमची पद्माच पहा ना. तुमची मुलगी म्हणून आम्हांला ती आवडत असली, तरी तिला आम्हीं सून करावी असं तुम्ही म्हटलं असतं म्हणजे त्या दृष्टीनें आम्हांला ती पसंत पडते कीं नाहीं तें आम्हीं पाहिलं नसतं का? तसंच यांनाही वाटत असेल आमच्या भूपालच्या बाबतींत.

**यशोदाबाई** : आतां आम्हीं म्हणूं नये...पण आमचा भूपाल खरोखरच चांगला मुलगा आहे.

**शंकरराव** : मलाही वाटतं, आमच्या पद्माला कांहीं तो वाईट नवरा नाहीं. (थोडा वेळ सर्वजण गप्प राहातात.)

**यशोदाबाई** : (अजूनही इंदिराबाई गप्प राहिलेल्या पाहून) आपणच बोलतों आहों...आणि ह्या आपल्या गप्पच आहेत.

**इंदिराबाई** : (चटकन् स्वतःला सांवरीत) आलें हं चहा घेऊन. (जाते.)

**गणपतराव** : शंकरराव, हा कांहीं विचित्रच प्रकार दिसतो आहे.

**यशोदाबाई** : त्यांना कांहीं पसंत पडलेलं दिसत नाहीं हें स्थळ.

**शंकरराव** : छे: छे:, तुम्हांला पाहून ती जरा भांबावली आहे.

अहो, किती झालं तरी तुमच्या मानानं आम्ही गरीब. तेव्हां हिला वाटत असेल हें जमायचं कसं ?

**यशोदाबाई :** हो ... तसंही असेल कदाचित. पण म्हणावं, आम्हांला मुलींसुद्धां हुंडा नको.

[ इंदिराबाई ट्रेमधून चहाचे कप घेऊन येते. ]

**शंकरराव :** पाहिलं का वहिनी काय म्हणतात त्या ?

**इंदिराबाई :** ( चहाचे कप प्रत्येकापुढें ठवीत ) काय ?

**यशोदाबाई :** म्हटलं, आम्हीं मोठा हुंडा मागूं म्हणून तुम्हांला चिंता लागली कीं काय ?

**इंदिराबाई :** छेः छेः...पण मला वाटतं, या बाबतींत आपण पद्माचा विचार घेतलेला बरा. आम्हीं आईबाप असलों, तरी ती कांहीं आतां लहान नाहीं.

**यशोदाबाई :** तिच्या इच्छेप्रमाणें झालं म्हणजे झालं ना ?

**इंदिराबाई :** हो. कारण नुकतीच ती थोड्या वेळापूर्वी म्हणाली होती...

**शंकरराव :** काय ?

**इंदिराबाई :** कीं आपला नवरा आपण पाहून ठेवला आहे म्हणून.

**गणपतराव :** म्हणायचीच ती. ( अर्थसूचकतेनें हंसतात. ) काय शंकरराव ?

[ इंदिराबाई, बावरलेल्या चेहऱ्यानें त्या तिघांकडेही आळीपाळीनें पाहाते. ते चहा घेतां घेतां हंसतात.]

**यशोदाबाई :** इंदिराबाई, तुम्ही पाहिला आहे का त्याला ?

**इंदिराबाई :** छेः — पण ती घेऊन येणार आहे त्याला.

**गणपतराव :** इथं ? केव्हां ?

**इंदिराबाई :** येईल थोड्या वेळानं.

**यशोदाबाई :** ( गणपतरावांस ) पहा कसा गुलाम ! आमच्या बरोबर येईना आणि आतां पद्माबरोबर येणार म्हणे.

**गणपतराव :** येऊं देच तर त्याला. आपण तोंपर्यंत बसूनच राहूं.

**इंदिराबाई :** ( भांबावलेल्या स्थितींत ) म्हणजे ? मी नाहीं समजलें.

**यशोदाबाई :** ती कुणाला घेऊन येणार समजलां तुम्हीं ?

**इंदिराबाई :** मला काय माहीत !

**यशोदाबाई :** अहो, आमच्या भूपालला.

**इंदिराबाई :** ( चमकून ) म्हणजे ?

**यशोदाबाई :** तोच तिनं पाहून ठेवला आहे तो.

**इंदिराबाई :** ( बेसावधपणें भयचकित मुद्रेनें ) काय...काय म्हणतां हें ? ( मटकन् खुर्चीवर बसते. )

**शंकरराव :** इतकं घाबरायला काय झालं तुला ?

**गणपतराव :** कुणा दुसऱ्याचं नांव सांगितलं तिनं तुम्हांला ?

**यशोदाबाई :** आम्हांला हें काल रात्रींच कळलं, इंदिराबाई. भूपालच्या लग्नाच्या गोष्टी काढल्या आम्हीं, तेव्हां त्याच्या मनांतून पद्माशीं लग्न करायचं आहे, हें कळलं आम्हांला.

**गणपतराव :** म्हटलं पद्मा म्हणजे आमच्या शंकररावांची मुलगी– तेव्हां विचारावं त्यांना ऑफिसांत.

**शंकरराव :** मीही रुकार दिला. म्हटलं स्थळ चांगलं आहे; शिवाय त्या दोघांनाही एकमेकांशीं लग्न करायचं आहे. तेव्हां हा अगदीं सोन्यासारखा योग जमून आला. पण...

**यशोदाबाई :** काय हो इंदिराबाई, तुम्हीं गप्प कां झालां अशा ? आम्हीं तरी काय समजावं बाई ?

**गणपतराव :** बरं का शंकरराव, नसेल यांच्या मनांतून तर स्पष्ट सांगायला हरकत नाहीं म्हणावं. अहो, मी तुमचा हेडक्लार्क असलों तरी ऑफिसांत. ह्या घरगुती गोष्टी ...सर्वांच्या मर्जीनुरूप

झाल्या तरच त्या करण्यांत गंमत. त्यांत एवढं यांनीं मनाला लावून घ्यायला नको.

**शंकरराव :** छेः छेः, तिला हें स्थळ कशाला नापसंत होणार ? तसं त्यांत काय व्यंग आहे ?

**यशोदाबाई :** तेंच तर त्यांना सांगा म्हणतें मी.

**गणपतराव :** हो...त्याशिवाय आम्हांला तरी कसं कळायचं ?

**इंदिराबाई :** ( थोडा वेळ थांबून मन तयार करीत ) क्षमा करा, यशोदाबाई. तुमचा भूपाल खूप चांगला मुलगा आहे... पण, पण माझ्या पद्माचं मी त्याच्याशीं लग्न होऊं देणार नाहीं.

**तिघेही :** ( एकदम ) हें काय ?

**इंदिराबाई :** यांत मी त्या दोघांचं मन मारतें आहे खरी, पण अकल्याण मात्र करीत नाहीं.

**यशोदाबाई :** तुम्हीं कशाला त्यांचं वाईट कराल ?...पण हें लग्न मोडायला तुम्ही कां तयार झालां, हें सांगूं शकणार नाहीं का ?

**इंदिराबाई :** नाहीं कसं अवश्य सांगेन. पण...पण त्यापूर्वी मी तुम्हाला एक प्रश्न विचारूं का ?

**यशोदाबाई :** व **गणपतराव :** } ( एकदम ) वाः वाः—अवश्य विचारा ना. काय विचारणार आहां ?

**इंदिराबाई :** भूपाल खरोखर तुमचाच मुलगा आहे का ?

[ तीं दोघें दचकून परस्परांकडे पाहातात. शंकरराव इंदिराबाईच्या ह्या प्रश्नानें स्तंभित होऊन तिच्याकडे पाहातात. ]

**शंकरराव :** ( अर्धवट उठून ) म्हणजे ? हा काय विचित्र प्रश्न ?

**इंदिराबाई :** विचित्र खराच. पण माझी ही शंका खोटी आहे का ? सांगा यशोदाबाई.

**यशोदाबाई :** तुम्हांला कुणी सांगितलं ?

**इंदिराबाई :** कुणीही का सांगेना. पण भूपाल तुमचा मुलगा नाहीं, हें खरं ना ?

**गणपतराव :** खरं आहे तुमचं म्हणणं.

**शंकरराव :** ( आश्चर्यातिरेकानें ) खरं ?

**गणपतराव :** होय शंकरराव. अगदीं जन्म झाल्यापासून आजपर्यंत जरी त्याला पोटच्या मुलाप्रमाणें आम्हीं वाढवला असला, तरी तो आमच्या पोटचा मुलगा नव्हे. मला वाटतं वीस वर्षें झालीं असतील...एका रात्रीं कुणीतरी मूल बाहेर रडतं आहे असा भास होऊन, हिनं मला जागं केलं. पाहतों तों खरंच ! एका फडक्यांत गुंडाळलेलं एक बाळसेदार, नुकतंच जन्माला आलेलं लुसलुशीत मूल त्या मध्यरात्रीच्या थंडींत ओरडत होतं. त्याला तशाच स्थितींत टाकून परत आंत जावं असं आम्हांला वाटेना.

**यशोदाबाई :** मी म्हटलं, देवानंच आमचं गाऱ्हाणं ऐकलं. आम्हांलाही मूल होत नव्हतं. तरी देखील चार दिवस यांनीं खूप तपास केला.

**गणपतराव :** पण मुद्दाम जो कोणी तें ठेवून गेला असेल, तो कशाला आम्हांला येऊन सांगणार ? तेव्हांपासून त्याला आम्हीं आतांपर्यंत अगदीं पोटच्या मुलाप्रमाणें पाळला. त्याला कधींदेखील जाणवूं दिलं नाहीं. तोही चांगला निघाला. आमच्या नशिबानं आम्हांला असलं रत्न लाभलं असं आम्हीं मानीत आलों, आणि आज......

**यशोदाबाई :** पण हें तुम्हांला कुणी सांगितलं ?

**इंदिराबाई :** जिच्या पोटीं तो जन्माला आला होता तिनं...

**यशोदाबाई :** ( एकदम ) कुठं आहे ती ? कुठं आहे भूपालची आई ?

**इंदिराबाई :** (अंतःकरणांतील भावना मोठ्या प्रयासानें दाबीत) इथंच–मुंबईंत आपल्या नवऱ्याशीं संसार करते आहे.

**गणपतराव :** इथंच आहे? आणि आज वीस वर्षांत ती आपल्या पोटच्या मुलाला पाहायला एकदांही आली नाहीं.

**इंदिराबाई :** कशी येणार? हा मुलगा तिला लग्नापूर्वी झाला होता. ती आपल्या तोंडानं तुम्हांला कशी येऊन सांगणार, कीं भूपाल आपला मुलगा आहे. आज भूपालला हें कळलं, तर त्याला काय वाटेल!

**यशोदाबाई :** पण त्याला पाहिल्याशिवाय तिला अजूनपर्यंत कसं हो राहवलं? आई ना हो ती?

**इंदिराबाई :** होय...आणि ती मधून मधून त्याला डोळे भरून पाहातेही.

**यशोदाबाई :** कुठं?

**इंदिराबाई :** कुठंही. रस्त्यांत, खिडकींत...जिथून तो दिसेल अशा ठिकाणाहून.

**शंकरराव :** कोण आहे ती?

**इंदिराबाई :** माझी एक मैत्रिण—अगदीं जीवाभावाची मैत्रीण.

**शंकरराव :** तुझी मैत्रिण? कोण बुवा? इथं तर कधीं पाहिली नाहीं आपण.

**इंदिराबाई :** कसे पाहाणार? ती दुपारची नेहमीं येते...तुम्हीं नसतांना.

**शंकरराव :** पण तुझ्या तोंडून नांवही ऐकलं नाहीं आपण तिचं इतक्या वर्षांत.

**इंदिराबाई :** तिला वचन दिलं होतं, कीं तुझी ही हकीकत मी कधींही कुणाला सांगणार नाहीं पण आज प्रसंग आला.

**गणपतराव :** पण मी म्हणतों, तुमच्या त्या मैत्रिणीचा तो मुलगा असला, म्हणून हें लग्न कां होऊं नये?

**यशोदाबाई :** हो—उलट मैत्रिणींतच हा संबंध जुळून आला तर...

**इंदिराबाई :** (मध्येंच) वाईट होईल. (सर्वजण जास्तच आश्चर्यानें तिच्याकडे पाहातात.)

**गणपतराव :** आजचा दिवस आश्चर्यातच जाणार कीं काय कळत नाहीं.

**यशोदाबाई :** इंदिराबाई, पद्माचं भूपालशीं लग्न झालं तर काय होईल म्हणतां ?

**इंदिराबाई :** भूपाल इथं वारंवार येईल...आणि तो येतो म्हणून त्याची आईही येईल; आणि एखाद दिवशीं भयंकर स्फोट होईल. वारंवार तो नजरेला पडल्यावर तिला आपल्या भावना दडवतां येतील, असं का तुम्हांला वाटतं ? किती झालं तरी ती त्याची आई आहे. तिच्या रक्तापासून त्याचा जन्म झाला. आहे. रक्ताला रक्त ओळखल्याशिवाय कसं राहील ? केव्हां तरी तिला आपल्या मनाला आवरणं असह्य होईल, ती बेभान होईल, त्याला पोटाशीं घेईल आणि भूपालला कळायला नको होतं तें कळेल. आपला जन्म कशा स्थितींत झाला आहे, हें कळल्यावर भूपालचं पुढचं आयुष्य कसं जाईल, याचा विचार करा. त्याच्या सुखासाठीं आज त्याचं मन मारलंच पाहिजे.

**यशोदाबाई :** पण तुमची मुलगी...

**इंदिराबाई :** तिचंही मन मला मारावं लागेल—त्या दोघांच्याही कल्याणासाठीं.

**शंकरराव :** पण तिला तूं काय सांगणार ? आत्तां ती भूपालला घेऊन येईल.

**इंदिराबाई :** येऊं दे. ईश्वर मला धैर्य देईल.

[ थोडा वेळ तेथें भयाण शांतता पसरते. ]

**गणपतराव :** ( थोड्या वेळानें ) *केवढी विचित्र परिस्थिति* आली ही ! काल रात्रींपर्यंत कल्पनाही नव्हती आम्हांला.

**यशोदाबाई :** काल आम्हीं त्याच्याकडे लग्नाची गोष्ट काढली काय आणि आज हें ऐकतो आहों काय—सारंच विचित्र.

**गणपतराव :** त्याला आतां काय आणि कसं सांगावं...कांहीं कळत नाहीं. तो यायच्यापूर्वी आपण इथून गेलं पाहिजे.

**यशोदाबाई :** मघां म्हणत होतां, तो इथं आला म्हणजे त्याला चकित करायचं.

**शंकरराव :** त्यांना तरी काय कल्पना, एकंदर परिस्थिति या थराला जाईल म्हणून ?

**यशोदाबाई :** इंदिराबाई, आतां हें लग्न मोडलंच, पण...मी तुम्हांला एक विनंती करूं का ?

**इंदिराबाई :** कसली ?

**यशोदाबाई :** तिला—भूपालच्या आईला एकदांच आमच्याकडे घेऊन या.

**गणपतराव :** भूपाल असतांना ?

**यशोदाबाई :** छेः, तो घरीं नसतांना याल ?

**इंदिराबाई :** ( स्वतःचें मन आवरीत ) हो.

**गणपतराव :** ठीक आहे. चला. ( उठतात. )

**इंदिराबाई :** क्षमा करा मला. मी तुमचं मन मोडलं...

**गणपतराव :** छेः छेः, त्यांत काय मोठंसं ? तुम्हीं सर्वांच्या हिताच्या दृष्टीनेंच हें लग्न मोडून टाकलंत. यांत तुमचा काय दोष ? बरं आहे शंकरराव.

**यशोदाबाई :** बरं आहे इंदिराबाई, घेऊन या हं तिला.

[ इंदिराबाई मानेनेंच रुकार देतात. गणपतराव व यशोदाबाई जातात. तीं गेल्यावर इंदिराबाई एक दीर्घ निश्वास सोडतात. शंकरराव कसल्यातरी भयंकर स्फोटानंतर पुन्हां सावध होऊन सभोंवार पाहावें त्याप्रमाणें कोंचावर बसून पाहातात. इंदिराबाई दुरूनच त्यांच्याकडे पाहातात व मनाचा निर्धार करून त्यांच्याजवळ येतात. ]

**शंकरराव :** ही गोष्ट तूं मला पूर्वी केव्हां तरी सांगायला पाहिजे होती.

**इंदिराबाई :** खरं आहे. पण मी तिला वचन दिलं होतं.

**शंकरराव :** पण माझ्यापासून देखील ही गोष्ट तूं लपवून ठेवावीस ?

**इंदिराबाई :** ( गंभीरतेनें ) याच्यापेक्षांही भयंकर स्वरूपाच्या गोष्टी केव्हां केव्हां लपवून ठेवाव्या लागतात नवऱ्यापासूनही.

**शंकरराव :** कोण ही तुझी मैत्रिण ?

**इंदिराबाई :** (किंचित्काल थांबून ) सांगतें. पण त्यापूर्वी मी एक प्रश्न विचारूं का ?

**शंकरराव :** विचार ना.

**इंदिराबाई :** समजा, तिचं लग्न व्हायच्या पूर्वी ती एखाद्या मागसाच्या प्रेमपाशांत सांपडली आणि त्यानं तिच्या तोंडाला काळं फांसून तिला फसवलं, तर तिला तुम्हीं वाईट ठरवाल ?

**शंकरराव :** तिला कां वाईट म्हणणार ? हा सारा त्याचा नीचपणा.

**इंदिराबाई :** असाच नीचपणा तिच्या बाबतींत एका चांडाळानं केला. तिला आपल्या नादीं लावलं, लग्न करीन म्हणून भूल पाडली आणि तिला मूल होतं आहे असा संभव दिसतांच, तो नाहींसा झाला. बिचारीचे आईबाप रडकुंडीला आले. आणि ती

बाळंत होतांच त्यांनीं तें मूल मध्यरात्रीं एका घराच्या ओसरीवर नेऊन ठेवलं. तेव्हांपासून तो यशोदाबाईच्या घरीं आहे. त्यानंतर दोन वर्षांनीं तिचं लग्न झालं. पण आज सतरा वर्षांत तिचं हें रहस्य बाहेर पडलं नाहीं. तिच्या नवऱ्याचं तर तिच्यावर कित्ती प्रेम आहे.

**शंकरराव :** आणि इतकं असून तिनं नवऱ्यापासून ही गोष्ट अजून लपवून ठेवली ?

**इंदिराबाई :** काय करणार बिचारी ! किती वेळां तरी तिला वाटतं, कीं आपलं मन त्याच्यापाशीं मोकळं करावं. पण पुन्हां तिला भय वाटतं...आपल्यावर इतकं प्रेम करणारा आपला नवरा आपली ही किसळवाणी हकीकत ऐकतांच आपल्यावर किती संतापेल ! इतकीं वर्षं सुखासमाधानांत चाललेल्या संसाराचं मातेरं होऊं नये, म्हणून ती अजून हें रहस्य तसंच मनांत ठेऊन त्याच्याशीं वागते आहे.

**शंकरराव :** मला नाहीं वाटत...

**इंदिराबाई :** काय ?

**शंकरराव :** तिच्याशीं इतक्या प्रेमानें वागणारा तिचा नवरा सतरा वर्षांपूर्वींची तिची हकीकत ऐकून तिच्यावर आतां रागावण्याचा असमंजसपणा करील !

**इंदिराबाई :** काय सांगावा नेम पुरुषांचा ! तिच्या हातून घडलेलं पाप तितकंच भयंकर आहे.

**शंकरराव :** त्यापेक्षांही भयंकर पापं पुरुषांच्या हातून घडतात. पण तीं बायकांना त्यांच्याकडून कधींच कळत नाहींत.

**इंदिराबाई :** आणि कळलीं तरी बायका आपल्या नवऱ्यांना सोडूनही जात नाहींत.

**शंकरराव :** मग तुझ्या मैत्रिणीनं तरी आपल्या नवऱ्याची भीति कां बाळगावी ! तोही तिला क्षमा करून घरांत ठेवील.

**इंदिराबाई :** असं वाटतं तुम्हांला ?

**शंकरराव :** खात्रीनं.

**इंदिराबाई :** तुम्हीं देखील क्षमा केली असती ?

**शंकरराव :** केव्हांही. कारण इतकीं वर्षं तुझं वर्तन चोख आहे, तूं एकनिष्ठपणानें वागते आहेस. तशीच जर तीही वागत असेल......

**इंदिराबाई :** तर तिचा नवरा तिला क्षमा करील ?

**शंकरराव :** खात्रीनं. (इंदिराबाई त्यांना आपली हकीकत सांगण्यासाठीं मन तयार करतात. तिला गप्प राहिलेलें पाहून) पण काय ग, ज्या नीच इसमानं तिला फसवलं, तो पुन्हां तिला भेटलाच नाहीं ?

**इंदिराबाई :** छेः...तो वारंवार तिला भेटतो.

**शंकरराव :** कुठं ?

**इंदिराबाई :** तिच्या घरीं.

**शंकरराव :** आणि ती त्याला आपल्या घरांत अजून येऊं देते ? म्हणजे तुझी ही मैत्रिण...

**इंदिराबाई :** थांबा, तो कां येतो तें नाहीं विचारलंत.

**शंकरराव :** कां ?

**इंदिराबाई :** पैसे मागायला.

**शंकरराव :** कशाबद्दल ?

**इंदिराबाई :** तिच्या नवऱ्याला तिची लग्नापूर्वीची हकीगत कळूं नये याबद्दल.

**शंकरराव :** म्हणजे...

**इंदिराबाई :** (त्याच्या बोलण्याकडे लक्ष न देतां) आणि तीही बिचारी आजपर्यंत त्याच्या धमक्यांनीं भिऊन त्याला मुकाट्यानें पैसे देत आली आहे.

**शंकरराव :** किती नीच माणूस आहे तो !

**इंदिराबाई** : ( तरीही त्यांच्या बोलण्याकडे लक्ष न देतां ) म्हणूनच आतां तिनं निश्चय केला आहे, कीं काय वाटेल तें होवो, आपल्या नवऱ्यापुढें आतां आपलं मन मोकळं करून ह्या यातनांतून कायमचं मुक्त व्हायचं.

**शंकरराव** : कुठं आहे ती ?

**इंदिराबाई** : इथंच.

**शंकरराव** : इथं ? कुठें ?

**इंदिराबाई** : तुमच्या समोर.

**शंकरराव** : ( एकदम ) इंदू...तूं...

**इंदिराबाई** : होय ...मी ...मीच ती मैत्रिण. इतकीं वर्षे तुमच्याशीं कपट करून तुम्हांला फसवणारी मीच ती चांडाळीण. आतां मला घरांतून हांकून लावा. काय वाटेल तें करा. तुम्हीं मला केवढंही शासन केलंत तरी माझ्या पातकाच्या मानानं तें लहानच ठरेल. आज सतरा वर्षे मी तुम्हांला फसवीत आलें. पण आज पद्मानं माझा घात केला. तिनं ठरवलेलं लग्न मोडण्यावांचून मला दुसरा उपाय नव्हता. मी अजूनही ही गोष्ट चोरून ठेवली असती, तर केवढा भयंकर प्रकार घडला असता ! पण आज मी माझ्या जिवावर उदार झालें. तुमच्यापुढें सारी हकीगत सांगून मोकळी झालें. आतां पद्माला हें ऐकून काय वाटेल...ती माझा किती तिरस्कार करील...देवा !

[ श्याम येतो. तो शंकररावांकडे पाहून नंतर इंदिराबाईकडे अर्थसूचक मुद्रेनें पाहातो व शांतपणानें विडी पेटवितो. शंकरराव त्याच्याकडे पाहून इंदिराबाईकडे दृष्टि फिरवतात. ]

**श्याम** : ( तिच्याकडे न पाहता विडी पेटवीत ) काय ठरवलंस ?

**शंकरराव** : कोण पाहिजे ?

**इंदिराबाई** : मी पाहिजे त्याला. सांग—आपल्या तोंडानं आपल्या नीच पराक्रमाची हकीगत सांग. उघड तोंड. आजपर्यंत मला धमक्या देत आलास आणि माझ्याकडून पैसे उकळलेस. आज तुझी धमकी खरी करून दाखव.

**श्याम** : इंदू, अजूनही विचार कर.

**इंदिराबाई** : विचार ? मूर्खा, तुला तोंड उघडायचं धैर्य नाहीं. पाप दुबळं असतं, हें लक्षांत ठेव. आतां मी तुला भीत नाहीं. माझं पाप मी आपण होऊन यांना सांगून टाकलं आहे.

**शंकरराव** : ( मध्येंच इंदिराबाईंना ) हाच तो ? ( इंदिराबाई मान हलवितात. ) चालता हो इथून. बदमाश. काय सांगणार तूं ? तूं सांगण्यापूर्वींच मला सारं कांहीं कळलं आहे. आतां निमूटपणें इथून चालता हो, नाहीं तर तुझ्या कमरेंत लाथ हाणून तुला बाहेर घालवीन.

**श्याम** : पण—

**शंकरराव** : ( त्याच्या अंगावर जाऊन ) खबरदार एक अक्षर काढशील तर. स्काऊंड्रल.

[ श्याम भेदरून एक एक पाऊल मागें टाकीत निघून जातो. शंकरराव एका खुर्चीवर असहाय्यतेनें बसतात व दोन्ही हातांनीं आपलें डोकें दाबून धरतात. इंदिराबाईंना काय करावें तें कळत नाहीं. त्या गोंधळून जातात. ]

**इंदिराबाई** : आतां एक भीति आहे. पद्माला तो हें सारं सांगेल.

**शंकरराव** : त्यापूर्वींच तिला सारं कांहीं सांगितलं पाहिजे.

**इंदिराबाई** : कसं सांगूं तिला ? माझं तोंड पाहायला तयार व्हायची नाहीं ती. आपली आई इतकी बदचालीची आहे, हें कळल्यावर तिला या घरांत राहणं देखील नकोसं होईल. माझा ती

केवढा तिरस्कार करील ! तुम्हांला सारी हकीकत सांगतांना देखील मी घाबरलें नसेन, पण पद्मापुढें मात्र मला तोंडून ब्र काढण्याचंहि सामर्थ्य नाहीं. काय वाटेल तिला ?

**शंकरराव :** कांहीं काळजी करूं नकोस. देवाला तुझी आणि माझी काळजी आहे. ( पद्मा येते. )

**पद्मा :** आई ! ( इंदिराबाई कांहींच बोलत नाहींत. पद्मा तिच्याकडे व शंकररावांकडे पहाते. )

**शंकरराव :** पद्मा...

**पद्मा :** काय आप्पा ?

**शंकरराव :** इकडे ये. ( पद्मा त्यांच्याजवळ येते. ) बैस. कुठं गेली होतीस ? ( पद्मा घाबरून इंदिराबाईकडे बघते. ) तुझ्या आईनं सारं कांहीं मला सांगितलं आहे. तो कां आला नाहीं ?

**पद्मा :** त्याचे आई न् बाबा इथं येणार होते, म्हणून तो येईना.

**शंकरराव :** ते आत्तांच येऊन गेले.

[ पद्मा त्यांच्याकडे व इंदिराबाईकडे उत्सुकतेनें पाहाते. दोघेंही तिच्या नजरेला नजर भिडविण्याचें टाळतात. अखेर शंकरराव खाकरतात व उसनें धैर्य आणतात. ]

पद्मा, आजपासून भूपालला विसरून जा. (पद्मा चमकते.)

**पद्मा :** ( एकदम आईकडे जाऊन ) आई !

[ इंदिराबाई तिला पोटाशीं घेतात. ]

**शंकरराव :** पद्मा, तुझं त्याच्यावर इतकं प्रेम असतांना तूं त्याला कोणत्याहि बाबतींत फसवतां नये...त्याला प्रत्येक गोष्ट मोकळेपणानें सांगायला हवी.

**पद्मा :** मी काय चोरून ठेवलं ?

**शंकरराव :** एक महत्त्वाची गोष्ट—कीं जी तुलाही अजून माहीत नाहीं.

**पद्मा :** महत्त्वाची गोष्ट ? कोणती !

**शंकरराव :** माझ्या पूर्वायुष्याची. तो जिच्याशीं लग्न करूं पाहतो आहे, तिचा बाप किती पातकी आहे, हें त्याला अजून माहीत नाहीं. ( इंदिराबाई चमकून त्यांच्याकडे पाहातात. )

**पद्मा :** ( भावनावशतेनें ) आप्पा—

**शंकरराव :** होय बेटा. तुझा हा बाप एक कर्मचांडाळ आहे. भूपालच्या आणि तुझ्या लग्नाचा हा विचित्र योग उद्भवला नसता तर तूंहि कदाचित् ह्या बाबाला मरेपर्यंत सज्जन समजत राहिली असतीस. पण आज त्याचे आईबाप आले...आईबाप कसले ? नुसते नांवाचे आईबाप.

**पद्मा :** म्हणजे ?

**शंकरराव :** पद्मा, भूपाल त्यांचा मुलगा नाहीं.

**पद्मा :** अप्पा —

**शंकरराव :** त्याचा खरा बाप हा पहा तुझ्यापुढें बेशरमपणें उभा आहे. ( इंदिराबाई चमकून त्यांच्याजवळ येतात. तिच्याकडे दुर्लक्ष करून ) आपल्या पापाची कुणकुणही कुणाला लागूं नये, म्हणून रातोरात भूपालला या हातांनीं मी गणपतरावांच्या घरच्या ओसरीवर नेऊन ठेवला. आणि तेव्हांपासून तो त्यांच्या घरीं वाढला. आजपर्यंत त्याला आपली ही जन्मकहाणी माहीत नाहीं; आणि तूं त्याच्या हिताला खरोखरच जपत असशील, तर तूं त्याला यापुढें कधींही भेटूं नकोस...त्याला आपली जन्मकहाणी कधींही कळतां नये. हा माझ्या अब्रूचा प्रश्न नाहीं...त्याच्या अब्रूचा

प्रश्न आहे. अजून सबंध आयुष्य त्याच्या डोळ्यापुढं आशेनें त्याच्याकडे पाहत आहे. तें मातिमोल होतां नये. आणि हें... फक्त तुझ्या हातीं आहे.

[ शंकरराव जड पावलांनीं तेथून जातात. थोडा वेळ भयाण शांतता पसरते. ]

**पद्मा** : ( ते गेल्यावर एकदम इंदिराबाईंना मिठी मारून ) आई—

**इंदिराबाई** : ( तिला पोटाशीं घेऊन ) बाळ—

**पद्मा** : खरं कां ग आप्पा म्हणाले ते ?

**इंदिराबाई** : ( आपलें मन आवरण्याचा प्रयत्न करीत ) होय बेटा.

**पद्मा** : हा त्यांचा घाणेरडा इतिहास ऐकून आई, तुला कांहींच वाटत नाहीं ?

**इंदिराबाई** : वाटतं...कमालीचा आदर वाटतो.

**पद्मा** : आदर ? आई...

**इंदिराबाई** : होय बेटा. त्यांनीं ही गोष्ट आपल्यापासून लपवून ठेवायचं मनांत आणलं असतं, तर तें त्यांना अशक्य का होतं ? आणि त्यांनीं ही हकीगत लपवून ठेवली असती, तर आज केवढा अनर्थ घडला असता ! तूं भूपालशीं लग्न लावून मोकळी झाली असतीस. त्यांनीं खरी हकीगत सांगून आपलं पाप आपल्या तोंडानं कबूल केलं, याबद्दल त्यांचा तिरस्कार करायचा ? हाच प्रकार माझ्या बाबतींत झाला असता, तर त्यांनीं माझा तिरस्कार केला असता का ? तूं माझा तिरस्कार केला असतास का ? तूं त्यांच्या मनाला जरासुद्धां दुखवतां नये, पद्मा.

**पद्मा** : पण मी भूपालला काय सांगूं ?

**इंदिराबाई** : तुला कांहीं सांगावं लागणार नाहीं. मात्र यापुढें तूं त्याला कधींही भेटतां नये–त्याच्या सुखासाठीं. जा, त्यांच्या-जवळ जाऊन बैस. त्यांचं सांत्वन कर. तुझ्यावर त्यांचा किती जीव आहे, तुला माहीत आहे. तुला काय वाटेल, याचीच सर्वांपेक्षां त्यांना जास्त चिंता वाटत होती. जा.

[ पद्मा जाते. इंदिराबाई ती जाईपर्यंत तिच्याकडे पाहातात. नंतर एक दीर्घ निश्वास टाकून खुर्चीवर बसतात व दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकतात. ]



## दिग्दर्शनाच्या सूचना

पडदा वर जातो, तेव्हां स्टेजवर कोणीच नसतें. समोर उजव्या बाजूला असलेल्या बाहेरच्या दरवाजांतून पद्मा हातांत पुस्तकें घेऊन घाइघाईनें येते, टेबलावर तीं टाकते व डाव्या बाजूच्या खोलींत निघून जाते. पुन्हां स्टेज रिकामें राहातें. पद्मा खोलींतून नॅपकिननें तोंड पुशीत येते, नॅपकिन बाजूच्या खुर्चीवर फेंकते व गुणगुणत उजव्या बाजूच्या भिंतीवर लावलेल्या आरशांत पाहून फणीनें केस नीटनेटके करते. एवढ्या वेळांत इंदिराबाई समोर डाव्या बाजूला असलेल्या स्वयंपाक खोलीच्या दरवाजांतून येऊं लागते, तोंच तिची नजर आरशासमोर उभ्या असलेल्या पद्माकडे जाते. क्षणभरच ती तिच्याकडे टक लावून पाहात राहाते आणि पद्मा वळून बाहेरच्या दरवाजाकडे जाण्यासाठीं निघालेली पाहातांच त्याच ठिकाणाहून हांक मारते, " पद्मा. "

ती हांक ऐकतांच पद्मा तेथल्या तेथें उभी राहाते व हळूच मान वळवून आपल्या आईकडे पाहाते व तिच्यावरून नजर काढून विचारते, " काय आई ? "

इंदिराबाई हळुहळु तिच्याकडे चालत येतां येतां विचारते, " कुठं चाललीस ? "

पद्मा गोंधळते व तिच्याकडे न पाहातां म्हणते, " जाते आहे —त्या सुशीलाकडे. "

असें म्हणून पुन्हां जाण्यासाठीं वळते. तोंच इंदिराबाई पुन्हां

तिला विचारते, "कुणाकडे म्हणालीस?" तेव्हां ती थांबून व तिच्याजवळ येत म्हणते, "नाहीं ग—"

इंदिराबाईनीं तिची लबाडी ओळखतांच ती खजिल होऊन खालीं मान घालून म्हणते, "नाहीं ग—"

इंदिराबाई तिच्या आणखी जवळ येत म्हणते—"पद्मा, कुणाशीं खोटं बोलते आहेस तूं..."

पद्मा तिच्याकडे पाहाण्याचें टाळीत म्हणते, "छेः ग."

आवाजांत गंभीरपणा आणून इंदिराबाई म्हणते, "मीहि एकेकाळीं तुझ्याएवढी होतें....जा." असें म्हणून इंदिराबाई टेबलाकडे पुस्तकें नीट करण्यासाठीं येऊं लागते. पद्मा तिच्या मागोमाग चालत येत म्हणते, "आई—" पद्माकडे न पाहातां थांबून इंदिराबाई विचारते, "काय बाळ?"

पद्मा तिच्या पाठीशीं उभी राहून तिचा हात हातांत घेत विचारते, "रागावलीस?"

इंदिराबाई वळून म्हणते, "छे:"

नंतर पद्मा तिच्या दृष्टीला दृष्टि भिडविण्याचें टाळून आपलें गुपित सांगण्याचा प्रयत्न करते व शेवटीं "कसं सांगूं तुला?" असें म्हणून तिच्या कुशींत तोंड खुपसते. इंदिराबाई तिचें तोंड कुरवाळीत म्हणते, "आतां सांगितलंस तसंच.—" नंतर तिचें तोंड वर करीत विचारते, "काय करतो तो?"

पद्मा तिच्याकडे न पाहातां तिच्या प्रश्नांचीं लाजून उत्तरें देत असते. स्टेजच्या मधोमध उभी राहून तीं दोघें बोलत असतात.

"बरं, पाहते हं येतो का तो." असें म्हणून ती चपला पायांत घालण्यासाठीं जाते, तेव्हां "इतकंही ऐकत नाहीं का तो तुझं? आणि म्हणे—" असें म्हणून इंदिराबाई तिच्याकडे हंसून

पाहाते. पद्मा तेथूनच "आई"! असें अर्धवट रुसून म्हणते, तेव्हां "बरं, जा" अशी इंदिराबाई तिची हंसून समजूत घालते. पद्मा जाते व इंदिराबाई टेबलावर तिनें फेंकलेलीं पुस्तकें नीटनेटकीं लावून तेथें तिनें टाकलेला नॅपकिन घेऊन डाव्या बाजूच्या खोलींत जाते. स्टेज रिकामें राहातें आणि नंतर समोरच्या उजव्या बाजूच्या दरवाजांत मागें पाहात पाहात येत असलेला श्याम दिसतो. तो उंबरठ्यांतच उभा राहून आंत पाहातो. तोंच डाव्या बाजूच्या खोलींतून इंदिराबाई प्रसन्न वदनानें गुणगुणत परत स्वयंपाक खोलींत जाण्यासाठीं येऊं लागते. श्याम खांकरतो. तिची नजर श्यामकडे जातांच ती थबकते. तिचा चेहरा गंभीर होतो व एकदम तिच्या तोंडून उद्गार निघतो, "श्याम". विडी पेटवीत तिच्याकडे न पाहातां श्याम दोन पावलं पुढें येऊन म्हणतो, "हुं."

ती तेथेंच टेबलाला टेंकून उभी राहून बोलते. "एक पै नाहीं मिळायची यापुढं." असें म्हणून ती स्वयंपाकखोलीच्या दिशेनें जाऊं लागते, तोंच तो शांतपणें म्हणतो, "असं तूं आतांपर्यंत कितीदां तरी म्हटलं आहेस."

ती थांबते आणि दरवाजांत उभी राहून त्याला उत्तर देते. तो आणखी जरा पुढें येतो व बोलतो. ती तेथेंच उभी राहून बोलते.

"थोड्या वेळानें मी परत येतो" असें म्हणून तो दरवाजाच्या दिशेनें जाऊं लागतो, तेव्हां ती पुढें होऊन म्हणते, "तुला यायची जरूरी नाहीं."

ती यावेळीं स्टेजच्या मधोमध येते. तो दरवाजांत उभा राहून बोलतो. "कळव–अवश्य कळव" असें म्हणून इंदिराबाई टेबलाजवळ जाऊन त्याच्याकडे पाठ करून उभी राहाते. तेव्हां तो पुन्हां थोडासा पुढें येऊन बोलूं लागतो, "तिचं काय होणार?"

ह विचारतांना ती टेबलाजवळच पण वळून त्याच्याकडे रागानें पाहाते. आणि जेव्हां श्याम " जातों मी " असें म्हणून पुन्हां दरवाजाकडे जाऊं लागतो तेव्हां ती त्याच्या मागोमाग "श्याम–श्याम" अशा हांका मारीत येते. पण तो निघून जातो आणि ती स्टेजच्या मधोमध असलेल्या एका आरामखुर्चीवर अंग टाकून हुंदके देत राहाते.

थोड्या वेळानें शंकररावांच्या "पद्मा– ए पोरी" या हांका ऐकूं येतात आणि ती एकदम उठून डोळे पदरानें पुसते. नंतर आंतल्या खोलींत जाण्यासाठीं निघतांना जमिनीवर श्यामनें तेथें टाकलेलें विडीचें थोटुक तिला दिसतें आणि तें उचलून ती खिडकीबाहेर टाकते व टेबलावरील पुस्तकें नीटनेटकीं लावण्याचा आविर्भाव करीत दरवाजाकडे पाठ करून उभी राहते.

शंकरराव हांका मारीत प्रफुल्लित मुद्रेनें येतात. त्यांच्या हातांतली छत्री ते कोंपऱ्यांत ठेवतात, दुपारच्या खाण्यासाठीं नेलेला डबा पिशवीसकट ते टीपॉयवर ठेवतात व कपडे काढून खुंटीला लावतां लावतां विचारतात, " कुठं गेली पोरगी ? "

इंदिराबाई त्यांनीं ठेवलेली पिशवी उचलून आंतल्या खोलींत नेत उत्तरें देते. ती आंत गेल्यावर शंकरराव शीळ वाजवीत खुर्च्या वगैरे नीट ठेवतात, टीपॉयवरचा टेबलक्लॉथ काढून डाव्या बाजूच्या खोलींत नेतात व तेथून दुसरा नवीन टेबलक्लॉथ आणतात व तो टीपॉयवर घालतात. टेबलावरील पुस्तकें, वर्तमानपत्रें वगैरे व्यवस्थित ठेवतात व हें सारें चाललें असतांना त्यांचें शीळ वाजवणें आणि गुणगुणणें चालूं असतें. इंदिराबाई पुन्हां दरवाजांत येऊन उभी राहून त्यांच्या ह्या हालचालीकडे पाहाते व विचारते " कसला आनंद झाला आहे एवढा ? "

ते इकडे तिकडे फिरत उत्तरें देतात. त्यांनीं "डॅमफूल?" म्हटल्यावर इंदिराबाई हंसते व पुढें टेबलाजवळ येऊन उभी राहते. ते मात्र इकडे तिकडे फेऱ्या मारतांना बोलत असतात. "ठीक आहे, ती आली म्हणजे तिला सांगावी" असें म्हणून ती लटक्या रागानें स्वयंपाकखोलींत जाऊं लागते. तेव्हां ते तिच्याजवळ येऊन म्हणतात, "वा : वा :, आणि तुला सांगायची नाहीं वाटतं? —अग, आपल्या पद्माचं लग्न ठरलं."

ती थांबून वळून त्यांच्याकडे पाहात विचारते, "लग्न? केव्हां?"

इंदिराबाई त्यांचें बोलणें शांतपणें-विशेष उत्सुकता न दाखवितां ऐकत असते. "तुम्ही शब्द दिला कीं काय?" असें ती गंभीरपणानें विचारते. नंतर मुलाबद्दल चौकशी करते तीही गंभीरपणानें व विशेष उत्सुकता न दाखवतां. शंकरराव मात्र अस्थिरपणानें इकडे तिकडे फिरत, स्वतःशींच हंसत, खुपींत उत्तरें देत असतात. ते तिला फराळाची तयारी करण्यासाठीं जायला सांगतात व ती जाऊं लागते, तेव्हां "जेव्हां तूं त्यांना पाहाशील" हे शंकररावांचे शब्द ऐकून ती थबकते व पुन्हां वळून विचारते, "म्हणजे माझ्या ओळखीचं स्थळ आहे?"

शंकररावांचें उत्तर ऐकून तिला आश्चर्य वाटतें व त्याच मनःस्थितींत ती आंत जाते.

ती गेल्यावर शंकरराव गुणगुणत खिडकीकडे, दरवाजाकडे अशा फेऱ्या मारतात, मध्येंच आरशासमोर उभे राहून केसांवरून फणी फिरवतात. अशी त्यांची चलबिचल चालली असतांना ते जमिनीवर कांहीं कागदाचा तुकडा दिसला तर उचलून खिडकीबाहेर टाकतात, खुंटीवरील कपडे ठाकठीक करतात, कोंपऱ्यांतल्या चपला नीट ठेवतात. अखेर बाहेर पायांचा आवाज ऐकून

ते दरवाजांतून बाहेर पाहातात आणि म्हणतात, “या–या वहिनी.”

ते आंत येतात व गणपतराव व त्यांच्या मागून यशोदाबाई स्लीपर व चपला काढून आंत येतात. ते एकंदर जागा पाहात पाहात पुढें येतात. बोलतां बोलतां गणपतराव मध्यभागीं ठेवलेल्या उजव्या बाजूच्या खुर्चीवर येऊन बसतात. यशोदाबाई उभ्या-उभ्याच घरांतील एकंदर वस्तु पाहात बोलतात. शंकरराव आंतल्या खोलीकडे मधूनमधून पाहात बोलत असतात.

यशोदाबाई “मी मारते हांका त्यांना” असें म्हणून आंतल्या दरवाजाजवळ येऊन इंदिराबाईंना हांका मारतात व मागें वळून गणपतराव व शंकरराव यांच्याकडे ‘आतां कशी गंमत होईल पहा’ अशा दृष्टीनें पाहातात. ते दोघेही त्याच मुद्रेनें त्या क्षणाची वाट पहातात.

इंदिराबाई पदराला हात पुशीत बाहेर येतांच त्यांना पाहून चकित होते, आणि तीं तिघेंही हंसू लागतात. इंदिराबाई त्यांना पाहून तशीच खिळल्यासारखी उभी राहाते, तिच्या तोंडून शद्बच फुटत नाहीं.

यशोदाबाई मागल्या बाजूला ठेवलेल्या खुर्चीवर बसत म्हणतात, “आम्हांला पाहून थक्क झालां असाल, नाहीं ?”

इंदिराबाई गुदमरलेल्या स्वरांत म्हणते, “झालें खरी....”

गणपतराव : “आलोंच आहों कीं आम्हीं.”

इंदिराबाई आश्चर्यानें विचारते, “तुम्ही ?” तिच्या मनांत मनस्वी खळबळ सुरू झाली असावी, असें तिच्या चेहऱ्यावरून दिसून येतें व ती आळीपाळीनें त्या तिघांकडे पाहाते. ती दरवाजांतच भिंतीचा आधार घेऊन उभी असते, शंकरराव टेबलाला टेकून उभे असतात, यशोदाबाई मागच्या बाजूस खुर्चीवर बसलेल्या असतात आणि गणपतराव मध्यभागीं ठेवलेल्या आरामखुर्चीवर

बसलेले असतात. ते मधूनमधून खिशांतली तपकिरीची डबी काढून तपकीर ओढीत असतात.

त्या तिघांचें बोलणें चाललें असतां इंदिराबाई खालीं मान घालून स्तब्धपणें ऐकत असते. मधून मधून ती शंकररावांकडे कटाक्ष टाकते व कोरड्या होत असलेल्या ओठावरून जीभ फिरवते. तेथें उभें राहणेंही तिला अवघड वाटतें. त्यामुळें चहा आणण्याचें निमित्त करून ती आंत निघून जाते तेव्हां तिला हायसें वाटतें.

इंदिराबाई आंत निघून गेल्यावर दरवाजाकडे पाहात तिघेही क्षणभर स्तब्ध राहातात. नंतर गणपतराव शंकररावांकडे पाहात गंभीर स्वरांत म्हणतात, " शंकरराव, हा कांहीं विचित्रच प्रकार दिसतो. "

इंदिराबाई ट्रे घेऊन येतांच यशोदाबाई उठून ट्रेमधून चहाचा कप घेतात. शंकरराव गणपतरावांना चहा देतात व एक कप स्वतः घेतात व हें करीत असतांना ते बोलतात. यावेळीं इंदिराबाई आंतून मनाची बरीच तयारी करून आल्या-सारखी दिसते. तिच्या बोलण्यावरूनही तिचें मन मघांपेक्षां बरेंच स्थिरस्थावर झालेलें दिसतें. परंतु जेव्हां गणपतराव " म्हणायचीच ती " असं म्हणतात व त्यावर तीं तिघेंही अर्थसूचकतेनें हंसतात, तेव्हां पुन्हां ती बावरते, आणि गोंधळलेल्या चेहऱ्यानें त्यांच्या-कडे पाहाते. ती यशोदाबाईशेजारीं उभी राहाते. पद्मा त्याला घेऊन येणार हें सांगतांच गणपतराव म्हणतात, " येऊं दे तर त्याला, आपण तोंपर्यंत बसून राहूं. "

तेव्हां तर इंदिराबाई आणखी गोंधळून जातात. आणि जेव्हां यशोदाबाई पद्मा भूपालला घेऊन येणार असें सांगतात, तेव्हां मात्र तिला जबरदस्त धक्का बसतो व ती चमकून विचारते, " काय–काय म्हणता हें ? " ती टेबलाजवळील खुर्चीवर बसते. त्यानंतर

तीं तिघेंहि आळीपाळीनें तिला प्रश्न विचारतात, आपापसांत बोलतात, परंतु तिचें कशाकडेहि लक्ष नसतें. शेवटीं ती मान वर करून खुर्चीवरून उठून, पण तशीच तेथें उभी राहून यशोदाबाईंना म्हणते, " क्षमा करा यशोदाबाई, पण्णार्च मी त्याच्याशीं लग्न होऊं देणार नाहीं. "

आणि जेव्हां ती गणपतराव आणि यशोदाबाई यांच्याकडे आळीपाळीनें पाहात विचारते, " भूपाल खरोखरीच तुमचा मुलगा आहे का ? " तेव्हां तीं दोघेंहि चकित होऊन एकमेकाकडे पाहातात आणि शंकरराव इंदिराबाईजवळ येऊन विचारतात, " हा काय विचित्र प्रश्न ? "

गणपतराव आणि यशोदाबाई या प्रश्नानें स्तंभित होतात. त्यापेक्षांहि शंकररावांना ह्या प्रश्नाचें आश्चर्य वाटतें; आणि जेव्हां गणपतराव भूपाल आपला मुलगा नाहीं असें सांगून त्याची जन्म-कहाणी सांगतात, तेव्हां शंकरराव मधून मधून इंदिराबाईकडे कटाक्ष टाकतात. तीही मधून मधून त्यांच्या मनावर काय परिणाम झाला हें पाहात असते. गणपतराव बोलत असतांना यशोदाबाई त्यांच्या मागें खुर्चीजवळ येऊन उभ्या राहातात. शंकरराव टेबलाजवळ व इंदिराबाई टेबलाजवळील खुर्चीच्या मागें उभ्या असतात.

यशोदाबाई तिच्याजवळ येऊन विचारतात, " पण हें तुम्हांला कुणी सांगितलं ? "

इंदिराबाई त्यांची दृष्टि टाळून उत्तर देते. नंतर देखील बोलतांना ती शक्य तों सर्वांची नजर टाळते. कारण तीं तिघेंही तिच्याकडे पाहात असतात.

शंकररावांनीं " कोण आहे ती ? " असें विचारतांच ती बावरते, आवंढा गिळते आणि म्हणते, " माझी एक मैत्रिण." आणि नंतर त्यांच्या नकळत त्यांच्याकडे एक कटाक्ष टाकते.

यशोदाबाई : "...मैत्रिणींतच हा संबंध जुळून आला तर–"

इंदिराबाई : "वाईट होईल."

गणपतराव इंदिराबाईकडे पाहातात व नंतर स्वतःशींच बोलल्यासारखे उद्गारतात, " आजचा दिवस आश्चर्यातच जाणार कीं काय कळत नाहीं. "

यशोदाबाईहि गप्प बसतात व नंतर इंदिराबाईजवळ येत विचारतात, " इंदिराबाई, पद्माचं भूपालशीं लग्न झालं तर काय होईल म्हणतां ? "

शंकरराव व गणपतराव इंदिराबाई आतां काय सांगते तें ऐकण्यासाठीं तिच्याकडे उत्सुकतेनें पाहातात. इंदिराबाई विचार-पूर्वक एक एक शब्द उच्चारीत बोलते.

यशोदाबाई " भूपालच्या आईला एकदांच आमच्याकडे घेऊन या " असें सांगते, तेव्हां इंदिराबाई त्यांच्याकडे न पाहातांच " हो " म्हणते आणि गणपतराव जाण्यासाठीं उठतात. तीं दोघेंही दरवाजापर्यंत जाऊं लागतांच शंकररावही त्यांना पोंचविण्यासाठीं जड पावलांनीं जातात. इंदिराबाईही धीर करून चार पावलें पुढें जातात व म्हणतात, " क्षमा करा मला–मी तुमचं मन मोडलं. "

तीं दोघेंही जातात. शंकरराव त्यांच्याबरोबर बाहेर जातात. इंदिराबाई मागें वळून, पण तेथेंच आरामखुर्चीला धरून उभी राहून पुढील प्रसंगाला तोंड देण्याची तयारी करते.

शंकरराव खालच्या मानेनें परत येतात व दरवाजांतूनच पाठमोऱ्या उभ्या असलेल्या इंदिराबाईकडे पाहातात व जड पावलें टाकीत गणपतराव पूर्वी बसलेल्या खुर्चीवर येऊन सावकाश बसतात. क्षणभर कोणीच कोणाशीं बोलत नाहीं. इंदिराबाई मागून शंकररावांकडे पाहात उभी असते. अखेर ते तिच्याकडे न

पाहतांच म्हणतात, "ही गोष्ट तूं मला पूर्वी केव्हां तरी सांगायला पाहिजे होती."

इंदिराबाई आवंढा गिळून म्हणते, "खरं आहे—"

शंकरराव तिच्याकडे मान वळवून विचारतात, "कोण ही तुझी मैत्रिण ?"

इंदिराबाई त्यांना कांहीं प्रश्न विचारते व ते विचारतांना ती टक लावून त्यांच्याकडे पाहात असते. ती मागें उभी असल्यामुळें त्यांना मात्र तें दिसत नाहीं.

आपल्या मैत्रिणीची हकीकत त्यांना सांगतांनाहि ती मधून मधून त्यांच्या चेहऱ्यावर उमटणारे विकार लक्षपूर्वक पाहाते. बोलतांना बेसावधपणें आपल्या तोंडून खरी गोष्ट बाहेर पडूं नये, म्हणून ती एकएक शब्द तोलून बोलते.

तिची सर्व हकीकत ऐकून शंकरराव उठून शतपावल्या घालीत थोड्या वेळानें म्हणतात, "मला नाहीं वाटत—"

"काय ?" ती जीव मुठींत घेऊन विचारते. पण त्यांचें उत्तर ऐकूनही ती त्यांच्यावरून नजर न हालवतां म्हणते, "काय सांगावा नेम पुरुषांचा !"

शंकरराव : "मग तुझ्या मैत्रिणीनें तरी आपल्या नवऱ्याची भीति कां बाळगावी ? तोही तिला क्षमा करील."

इंदिराबाई त्यांच्याकडे टक लावून पाहात विचारते, "असं वाटतं तुम्हांला ?"

शंकरराव : "खात्रीनं."

ती गुदमरलेल्या स्वरांत विचारते, "तुम्हीदेखील क्षमा केली असती ?"

आणि शंकरराव "केव्हांही" असें म्हणतात, तेव्हां ती सुटकेचा निश्वास टाकते. आणि मग त्यांनीं विचारलेल्या प्रश्नाला ती थोड्याफार निर्भयपणें उत्तरें देते. त्यांनीं "कुठं आहे ती ?"

असें विचारतांच ती क्षणभर थांबून पण त्यांच्याकडे न पाहातां म्हणते, " इथंच. "

" इथं ? कुठं ? "

" तुमच्यासमोर. " असें म्हणतांना जणूं तिच्या मनाचा अजून-पर्यंत सावरलेला भावनेचा बांध फुटतो.

शंकरराव खूप मोठ्यानें ओरडण्याचा प्रयत्न करतात. पण त्यांच्या तोंडून गुदमरलेल्या स्वरांत उद्गार निघतो–" इंदू-तूं–"

असें म्हणून ' आ ' वासून ते तिच्याकडे पाहात प्रेतासारखे उभे राहतात. तिचे डोळे भरून येतात. हुंदके अनावर होतात, पण ती आपल्या पापाचा पाढा त्यांच्यापुढें वाचते.

तिचें बोलणं संपतांच शंकरराव हळुहळु पायांतील शक्ति गेल्या-प्रमाणें चालत टेबलाजवळ जातात आणि तेथील खुर्चीवर बसतात. इंदिराबाई स्टेजच्या मध्यभागीं खुर्चीला टेकून मान खालीं घालून उभी असते.

श्याम येतो व त्या दोघांकडेही पाहतो. कांहींतरी विशेष प्रकार घरांत घडला असावा, हें तो जाणतो. पण खांकरून तिचें लक्ष आपल्याकडे वेधतो. तो बोलतांच त्याचा आवाज ऐकून शंकरराव बसल्या जागेवरूनच मान वळवून पाहात रुद्ध स्वरांत विचारतात, " कोण पाहिजे ? "

पण तो बोलण्यापूर्वीच इंदिराबाई त्याच्याकडे पाहात म्हणते, " मी पाहिजे त्याला. " असें म्हणून त्याच्या दिशेनें जात म्हणते, " सांग-उघड तोंड—"

तो कोण हें कळतांच शंकरराव त्याच्या अंगावर धांवतात व म्हणतात, " चालता हो— बदमाश. "

तो बोलण्याचा प्रयत्न करतो, पण शंकरराव त्याला घालवून देतात. तो गेल्यावर पुन्हां तेथें भयाण शांतता पसरते.

इंदिराबाई खिडकीजवळ ठेवलेल्या कोचावर जाऊन बसते.

शंकरराव यशोदाबाई बसल्या होत्या त्या खुर्चीवर जाऊन बसतात. थोड्या वेळानें इंदिराबाई तेथूनच बोलते. पण दोघेंहि एकमेकांकडे पाहात नाहींत.

पद्मा येते. ती प्रथम शंकररावांना पाहात नाहीं. ती इंदिराबाईकडे जाते. शंकररावांनीं बोलावल्यावर ती त्यांच्याजवळ जाते. पण त्या दोघांकडेही पाहून कांहींतरी विशेष प्रकार घडला असावा, असा तिला संशय येतो.

शंकरराव तिला 'भूपाल कां आला नाहीं' म्हणून विचारतात, व नंतर उठून तिच्याकडे न पाहातां एक एक शब्द उच्चारीत म्हणतात, "पद्मा, आजपासून भूपालला विसरून जा."

इंदिराबाई तशीच बसून असतां दोघांकडेही पाहात नाहीं. पद्मा तिच्या जवळ येऊन बसते. शंकरराव "माझ्या पूर्वीयुष्याची" असे शब्द तोंडून काढतात, तेव्हां इंदिराबाई चमकून त्यांच्याकडे पाहाते, आणि जेव्हां "त्याचा खरा बाप हा पहा तुझ्यापुढें बेशरमपणें उभा आहे" असें म्हणतात तेव्हां ती श्वास रोधून उभी राहाते व त्यांच्याकडे पाहात राहाते. ते मात्र तिची दृष्टि टाळतात व पद्माला उद्देशून पण स्वतःशींच बोलल्यासारखे बोलत असतात.

शंकरराव डाव्या हाताच्या खोलीकडे जड पावलांनीं जातात. त्यांच्याकडे इंदिराबाई पाहात राहाते. ते दृष्टिआड झाले तरी तिची नजर तशीच असते. पद्मा विचारीत असलेल्या प्रश्नांनाहि ती त्याच ठिकाणीं पाहात उत्तरें देते.

शेवटीं पद्माला त्यांच्या खोलींत जाऊन त्यांचें सांत्वन करण्यासाठीं ती पाठवते आणि ती दृष्टिआड झाल्यावर नंतर बाजूच्या खुर्चीवर धाडकन कोसळून ओक्साबोक्शीं रडूं लागते.

पडदा पडतो.



मो. ग. रांगणेकर यांच्या

आणखी पांच एकांकिका

- तुझं माझं जमेना
- फरारी
- येथें नवरे मिळतात
  (फक्त स्त्रियांसाठी)
- वर पाहिजे !
  (फक्त पुरुषांसाठीं)
- पहिली तारीख
  (मुलांमुलींसाठीं)

रामकृष्ण बुक डेपो

गिरगांव : मुंबई ४

मूल्य – १२ आणे